S - 20040719124622001 - 2500

<u>आदिवासी व ग्रामीण क्षेत्रात बाल मृत्यु कमी करण्याच्या दृष्टीने करावयाची उपाययोजना -</u>

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
क्र. एबाविं-२००२/प्र.क्र.३३३/का-६,
नविन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ सप्टेंबर , २००२.

**परिपत्रक :** एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत ० ते ६ वर्ष वयोगटातील मुले , गर्भवती स्त्रिया आणि स्तनदा माता यांना पूरक पोषण आहार, अनौपचारिक पूर्व शालेय शिक्षण , लसीकरण, आरोग्य तपासणी , संदर्भ आरोग्य सेवा व आरोग्य आणि सकस आहार या विषयी शिक्षण इ. सेवा पुरविण्यात येतात. एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही मुख्यत्वे करुन बालकांच्या पोषण व आरोग्य दर्जात सुधारणा करण्यासाठी तसेच बाल मृत्युचे व आजाराचे प्रमाण कमी करण्याच्या दृष्टीने राबविण्यात येत आहे. राज्यामध्ये विविध कारणांमुळे होणारे बाल मृत्यु विचारात घेता आदिवासी व ग्रामीण भागामध्ये नागरी भागापेक्षा बाल मृत्युचे प्रमाण अधिक असल्याचे आढळून येते. बाल मृत्युच्या अनेक कारणांपैकी, नवजात अर्भकाची वेळीच योग्य ती काळजी न घेणे हेही एक महत्वाचे कारण आहे . सार्वजनिक आरोग्य विभागातर्फे आदिवासी व ग्रामीण भागात आरोग्य कर्मचा-यांमार्फत आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्यात येतात. अंगणवाडी सेविकांनी आदिवासी व ग्रामीण भागातील महिलांच्या प्रसुतीच्या कामात दाईला / अधिपरिचारीकेला मदत करावी व नवजात अर्भकाची काळजी घेण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य करावे. अंगणवाडी सेविकांना वरील कामे प्रभावीपणे पार पाडणे शक्य व्हावे यादृष्टीने आरोग्य सेवा संचालनालयातर्फे अंगणवाडी सेविकांना योग्य ते प्रशिक्षण देण्यात यावे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

(ग.गो.पंचभाई)
शासनाचे सह सचिव.

प्रति,
मा.मंत्री (महिला व बाल विकास विभाग) यांचे खाजगी सचिव.
मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव .
मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास विभाग) यांचे खाजगी सचिव.
आदिवासी विकास विभाग , मंत्रालय , मुंबई
सार्वजनिक आरोग्य विभाग , मंत्रालय , मुंबई .
ग्रामविकास व जलसंधारण विभाग , मंत्रालय , मुंबई.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई .
आयुक्त , महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य , पुणे .
सर्व विभागीय आयुक्त .
आयुक्त , आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य , नाशिक .
महासंचालक , आरोग्य सेवा संचालनालय , महाराष्ट्र राज्य , मुंबई .
सर्व जिल्हाधिकारी .
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषदा .
निवड नस्ती. (का-६)